मध्ये केव्हा तगड्या*मोडत असत आणि लोखंडासारख्या तगड्या वैद्यलोक केव्हा केव्हा करून देत लढाईमध्ये डोळे दुखावले जात किंवा नासून जात, आणि शस्त्रवैद्य कृत्रिम† डोळे करून क्षत्रिय लोकास देत शरीरास बाण लागून त्यामध्ये जें शल्य राहून जात असे, ते हे वैद्यलोक काढीत आणि आर्यलोकास युद्धप्रसगी ज्या जखमा पडत त्या जखमास औषध उपाय करीत प्राचीन आर्यास युद्धप्रसगी जखमा लागतील अशी भीति वाटत असे, ह्मणून ते लढाईस जाण्यापूर्वी अगावर चिलखत घालीत, हातात दस्तन घालीत आणि डोक्यास शिरस्त्राण घालीत पदार्थाचे गुणदोष, अन्नपाण्याविषयीं नियम आणि स्वच्छता याविषयी सामान्य सिद्धात प्राचीन आर्यास ठाऊक होते भोजनादिकाच्या नियमाकडे ते लक्ष देत आणि पाण्याच्या योगेकरून हवा‡ स्वच्छ होते असें समजत ज्या घरात ते रहात असत त्या घराच्या भोवती ते बाग करीत, आणि त्या बागेमध्ये चमत्कारिक फुलझाडे लावून त्यामध्ये सुदर पायवाटा§ करीत घराची रक्षक जी विशेष देवता तिच्या स्तुतिपर एक सूक्त आहे त्यावरून आताच्या घराच्या स्वच्छतेकडे जितके लोक लक्ष देतात, तितकेच ते देत होते पौष्टिक अन्न आणि सुखकर वाऱ्याची झुळकी, ज्याचे वारवार ऋक्सहितेत वर्णन केलें आहे दूध, दहीं, लोणी, तूप, याचे गुणदोष प्राचीन आर्यांस ठाऊक असत, आणि दूध आणि सोमरस मिळून काही ते पक्वान्नें करीत

त्रिदोषाविषयीं¶ जी व्यवस्था त्यापासूनच सारे रोग उत्पन्न होतात असें ते समजत आणि तीन दोषाचें आधिपत्य तीन देवताकडे आहे असें मानीत भरतखडी सूर्यप्रकाश|| तीक्ष्ण असतो, तेणेंकरून काहीं रस शरीरात उत्पन्न होतात त्याच्या योगाने शरीरामध्ये आनद आणि उत्सव उत्पन्न होतो अशी जी सूर्यदेवता तिचे पित्तावर आधिपत्य हे पित्त अधिक झालें ह्मणजे ग्लानि आणि रोग उत्पन्न होतो ज्या ज्या पदार्थाचा स्वभाव कफ उत्पन्न करण्याचा त्या त्या साऱ्या रसात्मक पदार्थांवर आधिपत्य करणारी देवता पाणी,* तसाच शरीरामध्ये जो जो वायु आहे त्यावरती आधिपत्य करणारी देवता वायु† ऋग्वेदामध्ये राजयक्ष्मा‡ किंवा क्षय याचे वर्णन केले आहे, प्रसूतकालाच्या वेदना§, वारबाहेर पडणे आणि सामान्य शक्तिपात¶ याचे वर्णन केले आहे यावरून रोग्याच्या सबधाने शरीराची स्थिति काय होती, हें प्राचीन आर्यास ठाऊक होते

प्राचीन आर्यास शारीरकाचें|| काहीं ज्ञान होते आणि शरीरामध्ये जे व्यापार चालतात तेही त्याना ठाऊक होते नित्य खाण्याकरिता प्राचीन आर्य पशु मारीत, आणि तेणेकरून पुप्फुस,**काळीज, उदर, आतडी, मूत्रमार्ग, कोश आणि अशा प्रकारच्या विषयाची त्याना माहिती असे अशा विषयाची त्यास अवश्य माहिती असणे हे एक भूषण आहे असें त्यास वाटे चागली†† हवा लागून शरीरावर आणि काळजावर कसकसे

*तगड्या मोडत असत—( १-११६-१५ ) "कक्षीवान् दैर्घतमस औशिज अश्विनौ त्रिष्टुप्।" या मत्रात 'आयसी जङ्घा' असें सागितले आहे

†कृत्रिम डोळे—वर सागितलेला मत्र "तस्मादक्षी नासत्या विचक्ष आधत्त दस्रा भिषजावनर्वन् ।"

‡हवा स्वच्छ—ऋग्वेद (१०-९-१) "आपो हिष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन । महे रणाय चक्षसे ॥ यो व शिवतमो रसस्तस्य भाजयतेह न । उशतीरिव मातर ॥"

§पायवाटा—वास्तोष्पतिमत्र पहा

¶त्रिदोषाविषयी—या त्रिदोषाविषयी ( १-३४-६ ) यामध्ये या प्रमाणे आहे, "त्रिर्नो अश्विना दिव्यानि भेषजा त्रि पार्थिवानि त्रिरु दत्तमद्भ्य । ओमान शयोर्ममकाय सूनवे त्रिधातु शर्म वहत शुभस्पती ॥" यामध्ये 'त्रिधातु—वातपित्तश्लेष्मधातुत्रयशमनविषय सुख वहत' असें सायनाचे भाष्य आहे

||सूर्यप्रकाश —सूर्यप्रकाशाचे योगाने तमाचा नाश होतो व सहस्रकरानें भगवान् सूर्य प्राणिमात्रास सजीव करतो ही गोष्ट विदित आहेच ऋग्वेद ( २-३८-२ ) "विश्वस्य हि श्रुष्टये देव ऊर्ध्व प्रबाहवा पृथुपाणि सिसर्ति ।" द्विपाद व चतुष्पाद जनावरास तो स्वकार्यास लावतो जो सर्व ओजाचा आधार पूषन् (४-५३-३) "आ प्रा रजासि दिव्यानि पार्थिवा श्लोक देव कृणुते स्वाय धर्मणे । स नो देव सविता शर्म यच्छतु ॥"

*पाणी—आप व वरुण देवता याविषयी ऋग्वेदात अनेक ठिकाणी वर्णन आले आहे

†वायु—वावटळे वादळे इत्यादि ही हवेची विपरीत स्थिति झझावातादि ही त्याची प्रकृतस्थिति याचे अनुमान लक्षात येईल, व "विकृताविकृता देह घ्नन्ति ते वर्तयन्ति च ।" याचे स्पष्टीकरण होईल

वादळामध्ये झाडाचीझाडे समूळ उपटून जातात, त्या मेघगर्जनेचा प्रचड आवाज व ते हवेचे विक्राळ स्वरूप पाहून ब्रह्माड हालते कीं काय असें वाटते हे ऋषीच्या दृष्टीस येताच असे उद्गार निघाले ( ८-७-४ ) ( १-६४-७ ) ( १-६४-८ ) ( १-८५-८ ) ( ८-७-४ ) "वपन्ति मरुतो मिह प्रवेपयन्ति पवतान् । यद्याम यान्ति वायुभि ॥" "विचिन्वन्ति वनस्पतीन् ।" "सिहा इव नानदति ।" "भयन्ते विश्वा भुवना मरुद्भ्य ।" तोच झझावात वाहू लागला म्हणजे पाऊस पडू लागतो व पृथ्वीतील ऊष्मा नाहीसा होतो (५-५५-५ ) "उदीरयथा मरुत समुद्रतो यूय वृष्टि वर्षयथ ।"

‡ राजयक्ष्मा—( १०-१६३ )

§ प्रसूतकाळच्या वेदना—( १०-१६२ )

¶ सामान्य शक्तिपात —"अमीव ।"

|| शारीरकाचे—कोणी म्हणेल कीं जें काहीं यत्किंचित् इकडे तिकडे ऋग्वेदात सापडते यावरून आपण शारीरकाची प्रशसा करता काय? परतु विचार केला असता सहज ध्यानात येईल कीं ऋग्वेद संहिता हें शारीराचे पुस्तक नव्हे व शारीरसबधीं जीं सर्व इद्रियाची नावें अथवा त्याचे व्यापाराच्या अनुरोधानें जे वर्णन येतें ते केवळ त्यावेळी साधारण जी वैद्यकात माहिती होती तिला अनुलक्षून येते

**पुप्फुस—ऋग्वेद ( १०-१६३ ) छुबुक, मस्तिष्क, कीकसा, आत्र, गुद आणि यकृत्, हे या मत्रात येतात व या सबधाने जे विवरण आहे ते वर लिहिलेल्यास दृढ करिते ( ६-५३-८ ) येथे हृदय हा शब्द येतो जठर उदर कुक्षि हे ( ३-३६-८ ) ( ८-१-२३ ) ( ३-३५-६ ) यात मिळतात "विष्णुर्योनि कल्पयतु त्वष्टा रूपाणि पिंशतु ।" (१०-१८४) हे व या तऱ्हेचे अनेक लेख ऋग्वेदात सापडतात

††चागली हवा—(१०-१८६) "वात आवातु भेषज शम्भुमयोभुनो हृदे ।" हे वाता भेषजरूपी व हृदयास आल्हाद देणारा असा तू वाहा

परिणाम होतात, याचे वर्णन प्राचीन आर्य करितात अन्नाच्या योगेकरून शरीराला काय उपयोग होतो, जठराग्नीच्या योगाने अन्न पचन होते असे ते समजत, आणि त्यास केव्हा केव्हा असें वाटे की, नाडी आणि जीव याच्यामध्ये विशेष सबध आहे

अशा प्रकारें प्राचीन काळच्या वैद्यास अन्नपाचन, शरीरामध्ये जे वायु उत्पन्न होतात त्या वायूचे प्रसरण, मास, मेद, स्नायु, बध, रज्जु इत्यादिकाचे गुण आणि क्रिया ह्या त्यास ठाऊक होत्या इतके जर मान्य केलें नाही, तर ज्या सूक्तामध्ये राजयक्ष्म्यावर उपचार कसा करावा हें वर्णिले आहे, त्या सूक्ताचा यथायोग्य अर्थ करता येणार नाहीं द्यावापृथिवी ह्मणजे काय आणि त्याच्या योगाने शरीरावर काय काय सस्कार घडतात, शरीर ह्मणजे काय आणि वनस्पतीचा उपयोग कसा करायाचा अशा प्रकारचे ज्ञान सपादन करून त्याची योजना करण्याविषयी वैद्य झटत इकडे दुसरे वैद्य शस्त्राची योजना करून मनुष्यास सहाय करीत, असें असताही प्रसग पडला असता मत्राची* योजना आर्य करीत देवयजनभूमीवरील स्थडिलामध्ये नेहमी वास करणारे जे देव त्याचे आवाहन करून मत्र ह्मणत त्या मत्राच्या योगेकरून प्राचीन आर्याच्या चित्तवृत्तीस स्वस्थता होई त्याची भीति उडून जाई पिशाचाचे निवारण होई आणि आर्याची मन शाति होई

ब्रह्मवादी लोक ज्या वेळेस झाले, त्या वेळी आर्याचा उत्कर्ष होता, आणि ऋषिजनानी हिंदुस्थानातील लोकावर पूर्वी जय मिळविला होता त्यामुळे त्याच्या मनामध्ये जयानदाची जी लहर उठली होती, तेणेकरून या उत्कर्षामध्ये नवाच एक रंग उत्पन्न झाला असे जिकडे तिकडे लहान लहान राज्ये स्थापिली गेली योद्धे लोकाच्या मोठ्या स्वाऱ्या निघू लागल्या आणि ते आपली प्रतिष्ठा मिरवू लागले आर्याचा पगडा बसून गेला आणि इतकी सपत्ति त्याच्या हस्तगत झाली की, त्याचे डोळयावर धुदी आली, ते यशाने मदाध झाले, आणि एतद्देशीय लोकापेक्षा त्याच्या अगी तपोबल, बुद्धिबल आणि द्रव्यबल फार होते ह्मणून वर्चस्वाच्या अभिमानाने ते वागू लागले ते यज्ञ करू लागले आणि ऋषिजनाचे जे जे धर्मसबधी विचार होते त्याचें धोरण त्यानी सोडले नाहीं हे ऋषिजनाचे विचार ते कोणते ? आपणास जो जो जय मिळाला, जे जें सुख प्राप्त झाले, जी जी सपत्ति मिळाली ती ती देवानीं आपणास मिळवून दिली आणि हे सर्व आपणास यज्ञाच्या† योगाने मिळाले यज्ञ ह्मणजे ह्या देवास तृप्त करून घेण्याचे व वश करून घेण्याचे उपाय या ऋषिजनाच्या अगी भक्ति आणि श्रद्धा फार असे ते आपला यज्ञ आपणच करीत कारण ते कवि असत आणि त्यानी हिंदुस्थानावर स्वारी केली ह्मणून त्याची मने खवळली असत आणि त्याच्या अगी जो काय पराक्रम असे तो सारा बाहेर पडला असे हिंदुस्थानावर स्वारी करून जे काय प्राप्त करून घ्यावयाचे होते ते त्यानी करून घेतले होते कर्तव्य ह्मणून काही राहिले नव्हते मग आर्यांच्या सर्व शक्ति ढिल्या पडल्या त्याची हालचाल बद पडली पूर्वी त्याच्या अगी शौर्य व उत्साह असे आता ते ख्यालीखुशालीमध्ये निमग्न झाले पूर्वी त्याच्या अगी चळवळ असे आता ते सुस्त झाले खेळावे आणि शिकार करावी यावाचून दुसरे काही योद्धे लोकास सुचेना अशा प्रसगी पाडित्य करणारे जे लोक त्याना सधि चागली सापडली जे विद्वान् ते ब्राह्मण झाले ब्राह्मण निराळे व क्षत्रिय निराळे इतके प्राचीन काळीं यामध्यें वैमनस्य उत्पन्न झालें वैश्य ह्मणजे बाजारबुणुग लोकच असें एक प्रकारें समजण्यास चिंता नाही ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या आर्य समाजामध्ये शूद्राची गणना होत नसे शूद्र ह्मणजे केवळ दास अशा प्रकारच्या सामाजिक व्यवस्थेचे ऐतरेय ब्राह्मणामध्ये निरूपण केले आहे काहीं आर्यास अजून साहस करणे आवडे आणि काही कृषिकर्म करू लागले परतु ऐषआरामाचे साधन जी सपत्ति आणि सर्व लोकाचा उत्कर्ष येणेकरून आर्यास निरनिराळे विषय पाहून निरनिराळ्या पदार्थांचे अवलोकन करून विद्या वाढविण्याची चागली सधि सापडली अशा प्रकारचा जो त्याचा उद्योग, तो मोठा योग्य व लक्ष देण्याजोगा आहे पजाब देशातील नद्याच्या तीरी त्यानी वसाहती केल्या, सिधुदेशातील सिंधुनदाच्या तीरी ते राहू लागले आणि पेशावर आणि जलधर याच्यामधील हिमालय पर्वताच्या तळी बाजूवर त्यानी घरे बाधिली रजपुतस्थानातील जें वाळवट त्यातील सुपीक प्रदेशामध्ये त्यानी प्रवेश केला, या कारणामुळे ब्रह्मवाद्याच्या हाती पुष्कळच देश आला होता ह्मणून हवा ह्मणजे काय, तिचे फेरफार कसे होतात, प्रतिदिनी तिचे रंग कसे पालटतात, डोगरामधें आणि मैदानात कोणकोणते पशु आणि कोणकोणत्या वनस्पती* आढळतात, शरीरसपत्तीचा आणि पाण्याचा सबध काय आणि कोणकोणत्या धातु आणि कोणकोणते† खनिज पदार्थ ससारामध्यें उपयोगी पडतात, या सर्व

*मत्राची—( १०-८७ ) रक्षोहा ( १०-११८ ) रक्षोहा ( १०-१४५ ) सपत्निबाधन ( १०-१६१ ) राजयक्ष्मघ्न ( १०-१६२ ) गर्भ सस्रावे ( १०-१६३ ) यक्ष्मघ्न ( १०-१६४ ) दु स्वप्न ( १०-१६५ ) कपोतोपहतौ प्रायश्चित्त ( १०-१६६ ) सपत्नघ्न अशा मत्रावरून वर लिहिलेल्याचे अनुमान सहज होईल

†यज्ञाच्या योगाने—"सर्वमायुरेति य एव विद्वानुष्णिहौ कुरुते ।" ऐ० ब्रा० ( १-६ ) "त्रिष्टुभौ भवत सेन्द्रियत्वाय ।" ऐ० ब्रा० ( १-२२ ) "आग देव इत्यन्वाहा गतो हि स तर्हि भवत्यृतुभिर्वर्धतु ।" ऐ० ब्रा० ( २-२२ ) "विश्वरूप अवरुन्ध आत्मने च यजमानाय च ।" ऐ० ब्रा० "सपत्ना विजिति विजयते य एव वेद ।" "प्राणान् यजमाने दधाति । प्रजा च वाच च यजमाने दधाति । पशून् यजमाने दधाति ।" "वृष्टिमन्नाद्य यजमाने दधाति ।" ऐ० ब्रा० । "स्वस्त्येव होतोन्मुच्यते सर्वायु सर्वायुत्वाय ।" अशा तऱ्हेच्या अनेक लेखावरून यज्ञाच्या योगाने आपले सर्व धर्मार्थकाम पूर्ण होतात असा आर्य लोकाचा दृढ भरवसा होता

*वनस्पति—गुग्गुलु, खदिर, पलाश, हरिद्रा, करवीर, अशा तऱ्हेच्या वनस्पति ऐतरेय ब्राह्मणात वर्णन केल्या आहेत

†धातु आणि खनिज पदार्थ—सर्व अथर्ववेद धातु व खनिज पदार्थांच्या अनेक नावांनीं भरलेला आहे या सबधानें अथर्ववेदाचे

गोष्टीचा शोध करू लागले जी संपत्ति आपणास प्राप्त झाली आहे ती सारी आपली संपत्ति कदाचित् जाईल असे त्यास भय वाटू लागले आपली सुपीक शेते नष्ट होतील, आपल्या वसाहती मोडून जातील आणि आपली शरीरप्रकृति बिघडेल शरीरप्रकृतीविषयी इतकी काळजी असते तेथे वैद्यलोकांचा वदा चालतो यज्ञाच्या योगाने आपणास द्रव्य आणि शरीरसंपत्ति मिळते असे जरी ब्रह्मवादी लोक मानीत, तथापि व्यावहारिक साधनांकडे ते अलक्ष करीत नसत ऐतरेय, तैत्तिरीय, शतपथ, गोपथ आणि ताण्ड्य, ह्या ब्राह्मणग्रंथाचे अवलोकन केले म्हणजे असें लक्षात येते कीं, व्यावहारिक साधनांचा ते उपयोग करीत आणि हीं साधने योग्य असे ठरविण्याकरिता आणि त्याची उपपत्ति करण्याकरिता यज्ञसंबंधी काहण्या सागत लोकाची जी समजूत असते त्या समजुतीस अनुसरून कोणी उपपत्ति केली म्हणजे ती उपपत्ति योग्य असें लोकास वाटू लागते आणि मग ती उपपत्ति खरी असो किंवा खोटी असो लोक काहीच काळजी करीत नाहींत रोमन लोकानी आपले प्रचार एका बाजूला ठेविले आणि आपली सारी राज्यपरंपरा बदलून टाकली कारण लोकांवर राज्य करण्याचा त्याच्या मनाचा कल सिद्धीस गेला या वेळच्या आर्यलोकाची जी समजूत होती, तिजमध्ये निरनिराळे प्रकार नव्हते ते कोणीकडूनही ऐहिक सुख भोगीत आणि या ऐहिक सुखाचा आणि यज्ञाचा कसा तरी संबंध लावून त्याची उपपत्ति करीत आणि तोच धर्म आहे असें ठरवीत, म्हणून यज्ञ करणे हाच काय तो पुरुषार्थ असें ते समजत जेवढा आर्यांचा संसार तेवढा त्याचा यज्ञप्रपंच, हे आर्य तरी कसे, याच्या पूर्वजानी पराक्रम करून जे यश मिळविले, ते यश ते अजून स्मरत आणि तसेच आपले यश कायम रहावे म्हणून उत्कंठित असत देवयजनभूमीच्या ठायी आर्यलोक एकत्र जमून आपल्या मनाच्या वृत्ति व आपली पुढे गति काय याचा उद्गार करीत आणि जे जे शोध त्यानीं केले असत त्याचे विल्हेवारी विभाग जरी केले नव्हते आणि जरी त्या शोधावरून अनुगम बांधले नव्हते तथापि ते शोध सर्व आर्य आपल्या पंडितापुढे आणि योद्धेजनाच्या पुढे मांडीत ते कसे? यज्ञसंबंधी नियम करीत, कहाण्या सागत, आणि उपपत्ति करीत, तेणेकरून कोणकोणते रोग त्यानी बरे केले हे स्पष्ट कळे, भारद्वाज, बुलिल, शापर्ण, असे लोक खटपट करून मनुष्याचा किंवा सृष्टीचा शोध करण्यामध्ये आणि तत्संबंधीविषयाचे आकलन करण्यामध्ये निदान एक जन्म तरी घालवीत, अश्विनीकुमार किंवा त्याचे अनुयायी याना आता बाणाची शल्ये योद्ध्याच्या अंगातून काढावी लागत नव्हती हे खरे तथापि जनानखान्यामध्ये ख्यालीखुशाली भोगणाऱ्या स्त्रियाकडे जाऊन त्याना औषधउपाय करावे लागत, आणि सुईणपणा करावा लागे जलोदर किंवा विषूचिका झाली म्हणजे वैद्यलोकावाचून चालत नसे आणि ज्या ठिकाणी सुखसंपत्ति आणि ऐषआराम फार आहे त्या ठिकाणी असे रोग होणारच स्वच्छ हवेमध्ये फिरावयाचे नाही आळशीपणामध्ये उगीच लोळत राहावयाचे म्हणून आळसाच्या आणि ख्यालीखुशालीच्या योगाने जे परिणाम होतात ह्या सर्व गोष्टीविषयी *नारदाने मोठ्या कळकळीने सर्व लोकास उपदेश केला या सर्व गोष्टीवरून काय अनुमान निघते? की वैद्यक आणि शस्त्रविद्या याकडे लोकाचे लक्ष होतेच होते यासंबंधी वैद्यकशास्त्रामध्यें ब्रह्मगार्याची गति किती होती हे आता आह्मी वाचकापुढे मांडतो

द्रव्यगुण—ऋषिजनाच्या वेळी औषधि आणि शस्त्रविद्या याची मुख्य मुख्य तत्त्वे आर्यास कळली होती आणि ऋषीवर जे जे प्रसंग आले, त्या त्या प्रसंगामुळे वनस्पतीपासून किंवा धातूपासून त्यानी औषधे काढिली, किंवा शस्त्रप्रयोग केला आणि प्रसंग काढून घेतला आता आर्यांचा उत्कर्ष असल्यामुळें त्याना हवी तितकी फुरसत सापडली आणि साधनेंही मिळाली तेणेकरून ते सृष्टपदार्थांचा शोध अधिक करू लागले आणि रसायनाचा व शस्त्रविद्येचा उपयोगही अधिक होऊ लागला सुंदर गाडीतून बसून जात आहेत, तेव्हा सहजच गाडी उलटली किंवा काही अपघात झाला, मग शस्त्रवैद्याची गरज पडलीच पडली शस्त्रविद्येचे दोन भाग केले होते अश्विनीदेवतेचे जे अनुयायी, ते केव्हा केव्हा मनुष्यास नीट करीत केव्हा केव्हा जनावराची चिकित्सा करीत याप्रमाणे शुद्ध शस्त्रवैद्य आणि शालिहोत्री असे दोन प्रकारचे शस्त्रप्रयोग करणारे वैद्य आढळतात आणि निरनिराळ्या शस्त्राचीही त्याना माहिती असे कर्वताचाही उपयोग करीत शलाकेचा उपयोग करीत, आणि जखमेवर पट्टी देताना मधाचाही उपयोग करीत मादक आसव आणि औषधी आसवे †यामध्ये ते भेद करीत सोमरसासारखी मादक आसवे पिण्याचा तर आर्यलोकामध्ये प्रचार होता परंतु वैद्यलोक औषध म्हणून हीं आसवे देत सोमरसाम ये काही विकार न होता तो तयार व्हावा अशी त्याना सोमरस करण्याची रीति ठाऊक होती आणि ह्या रीतीची ऐतरेयब्राह्मणामध्ये स्तुति केली आहे ही गोष्ट इतिहासदृष्ट्या मोठ्या योग्यतेची आहे आसवविकृति कशी उत्पन्न होते आणि ती न व्हावी म्हणून काय काय केलें पाहिजे आणि आसवे व पेये यापासून काय काय परिणाम होतात, हे ठाऊक असणे, आणि ज्यामध्ये आसवविकृति नाहीं ती पेये चागली अशी मानणे या सर्व गो-

अध्ययन आर्यचिकित्सकास अतिशय अवश्य आहे या वेदामधील धातु व खनिजपदार्थांपैकी काहीची नावे सागतों

शीस अथर्ववेद ( १-२ ), मणि ( १-२९ ), सुवर्ण ( १-२९ ), जङ्गिड ( २-४ ), विष ( ४-६ ), शङ्ख ( ४१० ), पार्थिवानि रजांसि ( ६-२६ ), प्रतिसारो मणि ( ८-५ ), स्राक्त्यो मणि ( ८-५ ), वरणो मणि ( १०-३ ), मणिराग ( १०-६ ), मणि क्षत्रस्य वर्धन ( १९-२८ ), औदुम्बरो मणि ( १९-३१ ), सैन्धव ( १९-३४ ), दुर्णाम मणि १९-३६ ), असिन्मणावेकशत वीर्याणि सहस्र प्राणा ( १९-४५ )।

* ऐ० ब्रा० ( ७-१३ ) यामध्ये नारदाचा उपदेश पहा

† ऐ० ब्रा० ( ७-१७ ) "अथ हैत शुन शेपोज सव ददर्श। त मेताभिश्चतसृभिरभिसुषाव यच्चिद्धि त्व गृहे गृह इति।" "तमेवमेत भक्ष प्रोवाच रामो मार्गवेयो विश्वन्तराय सौषद्मनाय तस्मिन्होवाच प्रोक्ते सहस्रमु ह ब्राह्मण तुभ्य दद्म।" ऐ० ब्रा० ( ७-३४ ) ही आसवे उदुंबर, अश्वत्थ आणि प्लक्ष, या झाडापासून ते काढीत असत.

ष्टीवरून असे अनुमान काढता येते की, एकदर शास्त्रामध्ये आर्यांचा बराच प्रवेश झाला होता सोमरस नसला तर दुसऱ्या कोणत्या रसाने आपला निर्वाह करावा हेही त्याना कळले होते, म्हणजे त्यानी विशेष वनस्पतीच्या गुणदोषाचा शोध लाविला होता

शारीरक*विधेमधील शोध करण्याची पद्धति बदलली असे वाटते तुलना करण्याकरिता जी सामग्री पाहिजे होती ती त्याना मिळू लागली मनुष्याच्या शरीराचे मुख्य मुख्य भाग आणि जनावराच्या शरीराचे मुख्य मुख्य भाग याचे वर्णन त्याच्या ग्रथात आढळते, म्हणून भेदाभेद करणारे शारीरकशास्त्र निदान उत्पन्न तरी होऊ लागलें होते आर्याना शारीरकशास्त्राचे थोडेसे ज्ञान होते नव्हते ही काय मोठी गोष्ट आहे असे वाचकास वाटेल परतु मनुष्याने अवलोकन कसें केलें, त्याच्या जे जे दृष्टीस पडले ते ते त्याने लक्षात कसें ठेविलें, आणि सृष्टपदार्थाविषयी अनुगम कसे केले ह्या सर्व गोष्टीचे वर्णन करताना आनद वाटतोच वाटतो ज्या आर्याने यज्ञपशूच्या विभाग बरोबर करावा म्हणून शोध काढला त्याची ऐतरेयब्राह्मणामध्ये स्तुति केली आहे शारीरकविधेमध्ये आर्यांची गति झाल्यामुळें इद्रियविज्ञानशास्त्रावर† श्रम होऊ लागले जठराग्नीचे‡ वर्णन वैद्यशास्त्राच्या सबधानें होऊ लागले विद्युल्लता§ काय काय कार्ये करिते याचा शोध झाला, आणि गर्भकोशामध्ये¶ मूल हळू हळू कसे वाढते याचेही अवलोकन झाल्यामुळें गर्भशास्त्राची प्रवृत्ति होऊ लागली असे ठाऊक झाले कीं गर्भामध्ये प्रथम डोळा उत्पन्न होतो, आणि बाकीचे जे प्रकार त्या सर्वाचे सहज वर्णन झालें आहे या सर्व कारणामुळे प्राचीन आर्यलोकाची शास्त्रीयदृष्टी आणि नजर याची स्तुति केल्यावाचून आमच्यानें राहवत नाहीं पर्वत|| कसे उत्पन्न झाले याचे केव्हा केव्हा ब्राह्मणादि ग्रथामध्ये वर्णन आढळते आणि पृथ्वी कोठे उच का आणि कोठे सखल का याचे हुबेहूब शास्त्रदृष्ट्या निरूपण झाले आहे या शास्त्रामध्ये आर्यांची जी गति, तेणेकरून शास्त्रीयइतिहासकर्त्यास आश्चर्य वाटत नाहीं कारण त्याचे सामाजिक स्थितीमुळे त्याना अधिक शोध करण्याचे आवश्यक पडलें साधारण रोगाची जी यादि त्याच्या ग्रथात आढळते ती मोठी आहे. आणि ते सारे रोग अन्नाच्या विपुलतेमुळे किंवा आळसामुळें किंवा स्त्रियावर लंपटपणामुळे उत्पन्न आणि वृद्धिंगत होतात उदर,$ राजयक्ष्मा, शरीराची अस्वस्थता, प्लीहाचे रोग, केशाचे रोग, निरनिराळ्या प्रकारच्या खरुजा, पाढरें कुष्ठ, अकाली केश पिकणे, भलती भलती स्वप्ने पडणे किंवा भलत्याच तऱ्हेने मेह उत्पन्न होणे, आणि त्यापासून शक्तिपात आणि क्षय, अशा प्रकारच्या साधारण रोगाची लोकास पीडा असल्यामुळे सहजच वैद्यकाची प्रवृत्ति झाली शास्त्रीय वैद्य आणि शारीरक जाणणारे हे विशेष गोष्टीचा शोध करू लागले आरोग्य कशाने होते, निरनिराळ्या औषध देण्याच्या पद्धति, स्वच्छता* या विषयाकडे लक्ष पोहोचून हे विषय हळू हळू सग्राहक होत गेले वनस्पतिशास्त्राचाही विशेष अभ्यास होऊ लागला हिमालय पर्वताच्या बाजूवर उत्तरभद्र आणि दक्षिणकुरु या देशी ज्या वनस्पति† होत होत्या त्या विपुल आणि निरनिराळ्या तऱ्हेच्या असत म्हणून वनस्पतीच्या गुणदोषाचा विचार होऊ लागला आणि त्याचे विशेष अवलोकन झाल्यामुळे वैद्याचा मोठा उपयोग होऊ लागला बीज, त्या बीजाचा अकुर होणे आणि त्या अकुराचे एक अग खाली जाणे आणि एक अग वरती येणे, किंवा वृक्षाचे‡ अधोवर्धन किंवा ऊर्ध्ववर्धन या विषयाचे वर्णन केलें आहे, आणि ज्या झाडापासून आरोग्य साधते त्या झाडास ते पवित्र मानीत "वायु औषधीलहर§ सोड, सर्व औषधी तूच आहेस" अशा प्रकारचे उद्गार ज्याला आताशा स्वच्छता म्हणतात त्याचे तत्वच परतु स्वच्छतेकडे लक्ष असताही खाणे पिणे आणि पथ्य करणे याकडेही त्याचे लक्ष असे विशेष अवस्थेमध्ये मेढ्याचे मास तयार करणे, दुधाची नानाप्रकारची पक्वान्ने बनविणें, येणेकरून पदार्थाचे अगी पौष्टिक धर्म कसे कसे असतात याकडे ते लक्ष देत, परतु "हे जलहो,¶ तुमच्यापासून आम्हास औषधी मिळू द्या" अशी जी ते प्रार्थना करीत त्यामध्ये काहीं विशेष अर्थ आहे शस्त्रवैद्य ठिकाणोठिकाणी|| फिरत, जखमा बाधीत, व रोगाची यथायोग्य परीक्षा करून औषध देत या एका गोष्टीवरून असें सिद्ध होते कीं वैद्यकी प्रगल्भदशेस पावली होती आणि लोकामध्ये तिची प्रतिष्ठाही होती मनाच्या स्थितीवरून शरीरप्रकृतीची स्थिति बदलते किंवा प्रकृतीस हु-

* ऐ० ब्रा० ( ७-१ ) यामध्ये यज्ञपशूचे कसें विदारण करावें हें वर्णिले आहे. या विदारणाचे नियम होते व ते नेहमी गुप्त ठेवीत वपा, सेवनी, जरायु, उल्ब, वैकर्त, क्लोम, या सबधाने ऐतरेयब्राह्मण पहावा

† या सबधानें ऐ० ब्रा० ( २-२२ ) ( २-२ ) ( १-२ ) ( २-२३ ) ( २-१४ ) पहा

‡ तैत्तिरीय ब्रा० ( ३-९-१७ ) पहा

§ ऐ० ब्रा० ( ८-२८ ) पहा.

¶ ऐ० ब्रा० ( २-३२ ) ( ३-२ ) ( ३-३ ) ( ३-६ ) पहा

|| ऐ० ब्रा० ( ६-३५ ) पहा

$ या सबधानें हरिश्चद्राची गोष्ट ऐतरेय ब्राह्मणात सागितली आहे ती पहा व जे अनेक रोग वर सांगितले त्यांसंबधानें तैत्तिरीय सहिता ( २-३-५-२ ) तै० ब्रा० ( ३-९ ) ताड्य ब्राह्म० ( ५-१० ) अथर्ववेद ( १-२३ ) ( १-२४ ) ( १-३४ ) जेथे किलास व पलित याची औषधे सागितली आहेत

* तैत्तिरीय ब्राह्मण ( २-५ ) ( १-८ ) ( २-४ ) जेथे "वात आवातु भेषज" असा प्रारंभ होतो

† या वनस्पतीच्या सबधाने जसा धातु व खनिज याविषयी अथर्वण वेद उपयोगी आहे तसाच या सबधानें आहे. याकरिता काहीं वनस्पतीचा उल्लेख करितों ( १-२ ) शर , ( २-४ ) शण , "अघद्विष्टा देव जाता वीरुच्छपथयोपनी।" अथर्ववेद ( २-७ ), "बभ्रोरर्जुनकाण्डस्य यवस्य ते पलाल्या तिलस्य तिलपिञ्ज्या ।" अथर्ववेद ( २-८ ), "दशवृक्ष मुञ्चेम रक्षसो ग्राह्या ।" अथर्ववेद ( २-९ ), "श नो देवी पृश्निपर्ण्यश * * ।" अथर्ववेद (२-२५), "पाठामिन्द्रो जलाष भेषजम् ।" अथर्ववेद ( २-२७ ), "इद हिरण्य गुग्गुलु ।" अथर्व० ( २-३६ ), अशा प्रकारें दोनशें वनस्पतीची नावें निघतील

‡ ऐ० ब्रा० ( ७-३१ ) पहा.

§ तैत्तिरीय ब्रा० (२-४-१) "आवात वाहि भेषज त्व हि विश्वभेषज ।"

¶ या सबधाने तैत्तिरीय ब्रा० ( २-५-८-६ ) तेथें असें लिहिलें आहे "अपो याचामि भेषजम् ।"

|| शतपथ ब्रा० ( ४-१-५-८ ) "अश्विनौ ह वा इद भिषज्यन्तौ चरत. ।"

शारी येते, या गोष्टीवरून अध्यात्म* वैद्यकी कळू लागली होती असे दिसते मंत्र घालीत, आणि ताईतही† बांधीत ठार मारण्याकरिता विष देत म्हणून विषतंत्रवैद्यक उत्पन्न व्हावेच व्हावे या सर्व गोष्टीवरून असे सिद्ध होते कीं निरनिराळ्या विद्येसंबंधी माहिती बरीच गोळा झाली होती व तत्संबंधी केलेले शोध खरे असून, सर्व आर्य शास्त्रीय शोधाकडे लक्ष पोहोचवीत आणि उत्तेजन देत या सर्व विषयाचा परिणाम आचार्यांच्या वेळी नीट दिसून आला

आर्यलोक पूर्वीच हिंदुस्थानावर स्वारी करून चुकले होते त्यामध्ये त्यांनी वसाहती केल्या होत्या आणि सतत काहीएक प्रतिबंधावाचून त्यांचा उत्कर्ष झाला, तेणेकरून त्यांच्यामध्ये या उत्कर्षामुळे आवश्यक अशी जी सुधारणा ती उत्पन्न झाली ऋषींनी हिंदुस्थान जिंकले, ब्रह्मवाद्यांनी नाना ख्यालीखुशालीचे प्रकार सुरू केले त्यांच्या मागून आचार्य निरनिराळे उद्योग करू लागले प्राचीन इतिहासातील हा आर्यांचा वेळ उत्तम आर्यांनी पूर्वीच धैर्य दाखविलें होते आणि मोठी खटपट केली होती वालुकामय रानाचा आणि पर्वताच्या दऱ्याखोऱ्याचा त्यांनी शोध लावला होता, आणि नद्यांची पात्रे फिरविली होतीं या आर्यांची पुढे निरनिराळी राज्ये उत्पन्न‡ झाली निषादादि पूर्ण अनार्य लोक काही ब्रह्मण्य अनार्यलोक, आणि काहीं उपकुष्टादि आर्य आणि अनार्य यांच्या पोटचे लोक यांनी निरनिराळ्या रीतीने शुद्ध आर्यांचा§ विरोध केला म्हणून आर्यांसही उद्योग करावा लागला अनार्य, उपकुष्ट आणि ब्रह्मण्य अनार्य यांची एक मंडळी बनली होती आणि तिच्या स्वाधीन राजकीय सत्ता बरीच होती हे लोक स्वतंत्रपणानेच¶ विचार करीत आणि आर्यांच्या जाचणीमुळे घरेदारे सोडून यांना जंगलात जावें लागत असे या मंडळीमध्ये आणि आर्यांमध्ये केव्हा केव्हा तंटा उत्पन्न होई आणि तेणेकरून आर्यपरंपरेस धक्का बसण्याचा प्रसंग येई शुद्ध आर्यलोक साऱ्या आर्यावर्तभर पसरले होते आर्यावर्त म्हणजे उत्तरेस हिमालय पर्वत, दक्षिणेस विंध्याचल, पश्चिमेस आदर्शावली पर्वत, आणि पूर्वेस राजमहाल प्रांतातील टेकड्या || अशा प्रसंगी आर्यलोकही खटपट करू लागले त्यांनीं दक्षिण$ हिंदुस्थानातही स्वाऱ्या केल्या मदुराशहरी वसाहत केली, आणि लंकेपर्यंत जाऊन पोहोचले येणेंकरून त्यांची नजर वाढली, सोंटे बेत करणे आणि ते अमलात आणणें हें बुद्धिविकासाचे चिन्ह आहे आणि कटिबंध ज्यामध्यें आहे आणि ज्यामध्ये सामर्थ्य आहे, अशा राजकारस्थानाचेही चिन्ह आहे आर्यलोकांची राजसत्ता रामाने स्वारी करून इकडे वाढविली, तो इकडे आर्यावर्तातील रसज्ञ,* तत्त्वज्ञ आणि शास्त्रज्ञ आर्यही उगीच बसले नव्हते रामायण आणि महाभारत यामध्ये या वेळाचे ऐतिहासिक वर्णन पुष्कळ आहे आणि तेणेकरून त्या वेळचे आर्य धर्मसंबंधी, शास्त्रसंबंधी आणि तत्त्वज्ञानसंबंधी काय काय खटपट करीत होते हे समजून येते गृह्यसूत्रामध्येही यासंबंधी वर्णन आहे आर्यांच्या मोठमोठ्या† शाळा असत आणि कुटुंबी स्थिति किंवा सरदारी स्थिति ही सुटून आम्ही सारे आर्य म्हणजे एक मंडळी असे त्यास वाटू लागले होते चरण आणि परिषद् या सार्वजनिक सभामध्ये ते विचार करीत पुष्कळ आचार्य शास्त्रसंबंधी विचार करून, विल्हेवारीनिशी अनुगम बांधीत पूर्वी ब्रह्मवाद्यांनी जे जे शोध केले होते ते ते त्यांनी लिहून काढले ज्या ज्या आचार्यांची नावे वैद्यकशास्त्रसंबंधाने येतात ती ती नावे पाणिनि, कात्यायन यांच्या ग्रंथांत आढळतात आणि तेणेकरून आमच्या म्हणण्यास पोषक प्रमाण मिळते हीं नावे कोणती ? भरद्वाज, अंगिरस, जमदग्नि, आत्रेय, गौतम, अगस्त्य, वामदेव, कपिष्ठल, आश्मरथ्य, भार्गव, कुशिक, काप्य, कश्यप, शर्कराक्ष, मैमतायनि, अग्निवेश, सुश्रुत आणि चरक त्या वेळच्या काव्यामध्यें आणि उपनिषदामध्येही नारद, पुलस्त्य, असित, च्यवन, पैंगी आणि धौम्य हीं नावे आली आहेत, शास्त्रीय शोध करण्याची पद्धति त्यांना ठाऊक होती आणि जपून अवलोकन‡ करणे, छळून छळून परीक्षा करणे, आणि मोठेमोठे अनुगम बांधणे, यावर त्यांचा कटाक्ष असे शास्त्रीय शोधाची हींच मुख्य अंगे ह्या आचार्यांचे पराकाष्ठेचे परिश्रम यांनी वैद्यशास्त्रसंबंधी पुष्कळ ग्रंथ रचले त्यामध्ये आत्रेय, अग्निवेश आणि चरक, हीं नावे चिकित्सासंबंधानें घेण्याजोगी आहेत आणि शस्त्रप्रयोगाच्या संबंधाने धन्वंतरि आणि सुश्रुत हीं नावे घेण्याजोगीं आहेत यांनी वैद्यकाच्या संबंधाने द्रव्यगुणाचा शोध केला, आणि त्यास लागू असणारे जे दुसरे विषय तेही काहीं वगळले नाहींत या वेळेचे व्याकरणसंबंधी जे ग्रंथ आहेत त्यांची इतिहासदृष्ट्या योग्यता मोठी आहे या संबंधाने या आचार्यांच्या वेळाचे तीन भाग पडतात पाणिनीने शोध करून अनुगम बांधिले कात्यायनाने त्यावर टीका केली आणि नानातऱ्हेचे तर्क चालविले अती पतंजलीनें या ग्रंथाचा अर्थ करून मीमांसा केली या वेळच्या वैद्यकग्रंथ लिहिणाराचेही असे तीन भाग करता येतात जशीं पाणिनीचीं सूत्रें तशीच आत्रेयाची संहिता अग्निवेशाने या संहितेचा विचार करून तीवर टीका केली आणि चरकानीं त्याविषयी फारच मीमांसा केली असा हा या वेळच्या वैद्यकाचा इतिहास आहे वैद्यक आणि शस्त्रविद्या यामध्ये भेद आहे वैद्यांनीं नानाप्रकारच्या पदार्थांच्या गुणाचे विवेचन केले, आणि जसा

* गोपथ ब्रा० ( १-३० ) पहा

† तैत्तिरीय संहिता ( ४-२-६-२ ) पहा

‡ अष्टाध्यायी ( ४-१-१७४ ) "ते तद्राजा ।"

$ कात्यायन श्रौतसूत्रामध्ये व पूर्वमीमांसेच्या सहाव्या अध्यायात आर्य, निषाद, उपकुष्ट यांचा वादविवाद पहा

¶ पराविद्या आणि अपराविद्या याविषयी जो उपनिषदामध्ये भेद सांगितला आहे तो पहा

|| महाभाष्यामध्ये पतंजलीनं आर्यावर्ताच्या सीमा वर्णन केल्या आहेत त्या पहा।

$ महाभाष्यात पतंजलीने दक्षिणापथाचे वर्णन केले आहे ते पहा.

* यासंबंधी पतंजलीचे महाभाष्य पहा

† भीष्मपर्व पहा

‡ प्रोफेसर कुंटे यांचा तर्कशास्त्रावरचा निबंध पहा

ऋग्वेदसबधाने यास्काच्या निरुक्तामध्ये निघटु आहे, तसाच वैद्यकाच्या सबधाने धन्वतरीचा निघटु आहे सुश्रुताच्या ग्रथामध्ये काहीं पद्ये आहेत आणि काहीं गद्ये आहेत पद्यामध्ये मूळशोव आहेत आणि गद्यामध्ये त्याची मीमासा केली आहे भाषेच्या सबधानें ज्या ज्या आर्यानी विचार केला, आणि वैद्यकाच्या सबधाने ज्या ज्या आचार्यानी विचार केला या दोहोमध्ये साम्य आहे कारण दोहोचीही विचार करण्याची पद्धति एकच आहे आणि केव्हा केव्हा एकच आचार्य, वैद्यकाकडेही लक्ष देत आणि व्याकरणाकडेही लक्ष देत त्याच्या ग्रथावरून वैद्यक आणि त्याची प्रवृत्ति यासबधी जे जे विषय, त्यामध्ये आर्याची नजर किती पोहोचली होती आणि गति किती होती हे कळते द्रव्यगुण, कायचिकित्सा, उद्भिदशास्त्र, शारीरक, इद्रियविज्ञान, रसायनशास्त्र, निदान, शल्य, व शालाक्य, व रुग्विनिश्चय सुश्रुताच्या ग्रथातून आह्मी काहीं वेचे देतो त्यावरून आमचे ह्मणणे किती सप्रमाण आहे हे वाचकास समजेल ( सु सू अ ३ )—

"आगभिहितं सविंशमध्यायशत पञ्चसु स्थानेषु । तत्र सूत्रस्थानमध्याया षट्चत्वारिंशत् । षोडश निदानानि । दश शारीराणि । चत्वारिंशच्चिकित्सितानि । अष्टौ कल्पा । तदुत्तर षट्षष्टि ॥ ३ ॥

वेदोत्पत्ति शिष्यनयस्तथाऽ ययनदानिक ।
प्रभाषणाग्रहरणाव्रतुचर्याऽथ यान्त्रिक ॥ ४ ॥
शस्त्रावचारण योग्या विशिखा क्षारकल्पनम् ।
अग्निकर्मजलौकाख्यावध्यायौ रक्तवर्णनम् ॥ ५ ॥
दोषधातुमलायाना विज्ञानाध्याय एव च ।
कर्णव्यधामपक्वैषावालेपो व्रण्युपासनम् ॥ ६ ॥
हिताहितो व्रणप्रश्नो व्रणास्रावश्च य पृथक् ।
कृत्याकृत्यविधिर्व्याधिसमुद्देशीय एव च ॥ ७ ॥
विनिश्चय शस्त्रविधौ प्रनष्टज्ञानिकस्तथा ।
शल्योद्धृतिर्व्रणज्ञान दूतस्वप्ननिदर्शनम् ॥ ८ ॥
पञ्चेन्द्रिय तथा छाया स्वभावाद्वैकृत तथा ।
वारणो युक्तसेनीय आतुरक्रममिश्र(भूमि)कौ ॥ ९ ॥
भूमिभागो(मिश्रकाख्यो)द्रव्यगण संशुद्धौ शमने च य ।
द्रव्यादीना च विज्ञान विशेषो द्रव्यगोऽपर ॥ १० ॥
रसज्ञान वमनार्थमध्यायो रेचनाय च ।
द्रवद्रव्यविधिस्तद्वदन्नपानविधिस्तथा ॥ ११ ॥
सूचनात्सूत्रणाच्चैव सन्धानाच्चार्थसन्तते ।
षट्चत्वारिंशदध्याय सूत्रस्थान प्रचक्षते ॥ १२ ॥
वातव्याधिकमर्शासि साश्मरिश्च भगन्दर ।
कुष्ठमेहोदरा मूढो विद्रध्य परिसर्पणम् ॥ १३ ॥
ग्रन्थिवृद्धिभमशूकक्षुद्रा(क्षुद्रशूकभग्ना)श्च मुखरोगिकम् ।
हेतुलक्षणनिर्देशान्निदानानीति षोडश ॥ १४ ॥
भूतचिन्ता रज शुद्धिर्गर्भावक्रान्तिरेव च ।
व्याकरण च गर्भस्य शरीरस्य च यत्स्मृतम् ॥ १५ ॥
प्रत्येक मर्मनिर्देश सिरावर्णनमेव च ।
सिराव्यधो धमनीना गर्भिण्या व्याकृतिस्तथा ॥ १६ ॥
निर्दिष्टानि दशैतानि शारीराणि महर्षिणा ।
विज्ञानार्थं शरीरस्य भिषजा योगिनामपि ॥ १७ ॥
द्विव्रणीयो व्रण सद्यो भग्नाना वातरोगिकम् ।
महावातिकमर्शासि साश्मरिश्च भगन्दर ॥ १८ ॥
कुष्ठाना महता चापि मैहिक पैडिक तथा ।
मधुमेहचिकित्सा च [तथा चोदरिणामपि ॥ १९ ॥
मूढगर्भचिकित्सा च] विद्रधीना विसर्पिणाम् ।
ग्रन्थिवृद्ध्युपदशाना तथा च क्षुद्ररोगिकम् ॥ २० ॥
शूकदोषचिकित्सा च तथा च मुखरोगिणाम् ।
शोफस्थानागताना च निषेधो मिश्रक तथा ॥ २१ ॥
वाजीकर च यत्क्षीणे सर्वाबाधशमोऽपि च ।
मेधायुष्करण चापि स्वभावव्याधिवारणम् ॥ २२ ॥
निवृत्तसन्तापकर कीर्तितं च रसायनम् ।
स्नेहोपयौगिक स्वेदो वमने सविरेचने ॥ २३ ॥
तयोर्व्यापच्चिकित्सा च नेत्रबस्तिविभागिक ।
नेत्रबस्तिविपत्सिद्धिस्तथा चोत्तरबस्तिक ॥ २४ ॥
निरूहक्रमसज्ञश्च तथैवातुरसज्ञक ।
धूमनस्यविधिश्चाग्र्य(न्त्य)श्चत्वारिंशदिति स्मृता ॥ २५॥
प्रायश्चित्त प्रशमन चिकित्सा शान्तिकर्म च ।
पर्यायास्तस्य निर्दिष्टाश्चि(दैशाच्चि)कित्सास्थानमुच्यते २६
अन्नस्य रक्षा विज्ञान स्थावरस्येतरस्य च ।
सर्पदष्टविषज्ञान तस्यैव च चिकित्सितम् ॥ २७ ॥
दुन्दुभेर्मूषिकाणा च कीटाना कल्प एव च ।
अष्टौ कल्पा समाख्याता विषभेषजकल्पनात् ॥ २८ ॥
अध्यायाना शत विंशमेवमेतदुदीरितम् ।
अत पर स्वनाम्नैव तन्त्रमुत्तरमुच्यते ॥ २९ ॥
अधिकृत्य कृत यस्मात् तन्त्रमेतदुपद्रवान् ।
औपद्रविक इत्येष तस्याप्यत्वान्निरुच्यते ॥ ३० ॥
सन्धौ वर्त्मनि शुक्ले च कृष्णे सर्वत्र दृष्टिषु ।
सविज्ञानार्थमध्याया गदाना तु प्रति प्रति ॥ ३१ ॥
चिकित्साप्रविभागीयो वाताभिष्यन्दवारण ।
पैत्तस्य श्लैष्मिकस्यापि रौधिरस्य तथैव च ॥ ३२ ॥
लेख्यभेद्यनिषेधौ च छेद्याना वर्त्मदृष्टिषु ।
क्रियाकल्पोऽभिघातश्च कर्णोत्थास्तच्चिकित्सितम् ॥ ३३ ॥
घ्राणोत्थाना च विज्ञान तद्वदप्रतिषेधनम् ।
प्रतिश्यायनिषेधश्च शिरोगदविवेचनम् ॥ ३४ ॥
चिकित्सा तद्गदाना च शालाक्यं तन्त्रमुच्यते ।
नवग्रहाकृतिज्ञान स्कन्दस्य च निषेधनम् ॥ ३५ ॥
अपस्मारशकुन्योश्च रेवत्याश्च पुन पृथक् ।
पूतनायास्तथाऽन्धाया मण्डिका शीतपूतना ॥ ३६ ॥
नैगमेषचिकित्सा च ग्रहोत्पत्ति सयोनिजा ।
कौमारतन्त्रमित्येतत् शारीरेषु च कीर्तितम् ॥ ३७ ॥
ज्वरातिसारशोषाणां गुल्महृद्रोगिणामपि ।
पाण्डूना रक्तपित्तस्य मूर्च्छाया पानजाश्च ये ॥ ३८ ॥
तृष्णायाश्छर्दिहिक्काना निषेधः श्वासकासयो ।
स्वरभेदचिकित्सा च कृम्युदावर्तिनो. पृथक् ॥ ३९ ॥

विसूचिकारोचकयोर्मूत्राघातविकृच्छ्रयो ।
इति कायचिकित्साया शेषमत्र प्रकीर्तितम् ॥ ४० ॥
अमानुषनिषेधश्च तथाऽऽपस्मारिकोऽपर ।
उन्मादप्रतिषेधश्च भूतविद्या निरुच्यते ॥ ४१ ॥
रसभेदा स्वस्थवृत्तिर्युक्तयस्त्रान्त्रिकाश्च या ।
दोषभेदा इति ज्ञेया अध्यायास्तन्त्रभूषणा ॥ ४२ ॥
श्रेष्ठत्वादुत्तर ह्येतत् तन्त्रमाहुर्महर्षय ।
बह्वर्थसग्रहात् श्रेष्ठमुत्तर चापि पश्चिमम् ॥ ४३ ॥
शालाक्यतन्त्र कौमार चिकित्सा कायिकी च या ।
भूतविद्येति चत्वारि तन्त्रे तूत्तरसज्ञिते ॥ ४४ ॥
वाजीकर चिकित्सासु रसायनविधिस्तथा ।
विषतन्त्र पुन कल्पा शल्यज्ञान समन्तत ॥ ४५ ॥
इत्यष्टाङ्गमिद तन्त्रमादिदेवप्रकाशितम् ।
विधिनाऽधीत्य युञ्जाना भवन्ति प्राणदा भुवि ॥ ४६ ॥"

वैद्यशास्त्राचा इतिहास ह्या प्रस्तावनेमध्ये वाचकापुढे ठेवला आहे तो समाप्त करण्यापूर्वी वाग्भट कधी झाला, या प्रश्नाच्या उत्तराचे निदान दिग्दर्शन तरी करणे या स्थळी योग्य आहे वाग्भटाच्या ग्रथामध्ये वैद्यशास्त्राचे सविस्तर निरूपण आहे वैद्यकविद्या आणि शस्त्रविद्या याविषयी पडितानीं मोठे श्रम घेऊन जे जे सिद्धात केले, जें जें तत्त्वविवेचन केले, आणि याचा जो जो अनुभव पाहिला ह्या सर्व गोष्टींचें विवेचन वाग्भटाच्या ग्रथामध्ये आढळते हे सारे शोध बौद्धाचार्य, वैदिकाचार्य, ब्रह्मवादी आणि ऋषि यानी आरभिले होते मानसिक शारीरिक व्यथा म्हणजे आधि आणि व्याधि यामधील भेदाचा विचार केला होता मोठी तत्त्वज्ञता आणि शास्त्रीयदृष्टि हीं त्यामध्ये पूर्ण रीतीनें वसत होती तेणेकरून त्याची योग्यता किती मोठी असें आम्हास वाटल्यावाचून राहत नाहीं बौद्धधर्माचा जो प्रथम उद्भव त्याच्या अगीं विशेष महत्त्व येते, कारण बहुधा वाग्भट बौद्ध होता असें म्हणावे लागते आणि ख्रिस्ती शकाच्या पूर्वी २०० वर्षें वाग्भटाचा ग्रथ तयार झाला असेल असें अनुमान करता येते या कालक्रमाविषयीं हवे तितकें अतरग प्रमाण वाचकापुढें माडता येईल तथापि विनयपूर्वक आम्ही पुढील गोष्टींचें विवेचन करतो

१ वाग्भटाच्या पूर्वीच पुष्कळ वैद्यक ग्रथ होऊन गेले होते त्या ग्रथाचीं नावे वाग्भट आपल्या ग्रथात घेतो

२ वात, पित्त, कफ याविषयी वाग्भटाचे सिद्धात स्पष्ट आणि सुलभ असल्यामुळें ख्रिस्ती शकापूर्वी पाचव्या किंवा साहाव्या शतकामध्ये वाग्भट झाला नव्हता असें अनुमान काढता येतें कारण त्या वेळेचे वात, पित्त, कफ याविषयीं जे सिद्धात ते हेंगडमताचे आणि अस्ताव्यस्त आहेत होआथीसाग म्हणून जो चिनई बौद्ध त्यानें या वेळी हिंदुस्थानात प्रवास केला त्याचा वैद्यकसबधीं लेख आहे.

३ मास हे पथ्य आहे असें वाग्भट स्पष्ट वर्णन करतो यावरून वैदिकपरपरा अजून नष्ट झाली नव्हती आणि "अहिंसा परमो धर्म" हा बौद्ध लोकाचा सिद्धात निदान पडितानी तरी अगिकारला नव्हता

४ उपनिषदामध्ये जसे साहा रसाचे वर्णन केले आहे तसेंच वाग्भटाने आपल्या ग्रथात निरूपण केले आहे

५ सर्व दु ख सर्व दु खमय असे प्रथम जें बौद्धाचार्य म्हणू लागले, त्या गोष्टीस अनुलक्षून मानसिक व्यथेस वाग्भटानें महत्त्व दिलें आहे

६ सौवीरासारख्या देशाचीं प्राचीन नावे आणि वर्णने वाग्भटाचे ग्रथात आढळतात

७ कात्यायन जो वार्तिककार त्याने हिंसाशब्दाचा जसा अर्थ केला आहे तसाच अर्थ वाग्भटाच्या ग्रथात आढळतो

८ बौद्धलोकानीं सार्वत्रिक प्रीतीच करावी असा जो सिद्धात केला होता तो वाग्भटास मान्य होता असें दिसते

९ बौद्धलोकाच्या चैत्यादिक सप्रदायाचा वाग्भट अनुवाद करतो

१० सुश्रुताचे नाव कात्यायनाने घेतले आहे आणि सुश्रुतानतर वाग्भट झाला

११ अनार्याची सेवा करू नये असे वाग्भट म्हणतो आणि गुप्त वशातील मौर राजे हे अनार्याचे अभिमानी होते ही गोष्ट बौद्धधर्म प्रबल होण्याच्या पूर्वीची आहे नुकताच बौद्धधर्म सुरू झाला होता तेव्हा ही विशेष आढळण्यात येते

१२ दक्षिणापथामध्ये शृगबेर म्हणून नगर आहे त्याचे नाव वाग्भटानें घेतलें आहे आणि दक्षिणेकडून जो वायु येतो तो चागला असे वर्णन केले आहे पतजलीच्या वेळीं दक्षिणापथ आर्य लोकास नुकताच माहीत होता

१३ सुरापान औषधाकरिता करावे असे वाग्भट सागतो

१४ असे असताही इद्रियदमनाची विशेष योग्यता वर्णिली आहे म्हणून वाग्भटाच्या वेळीं बौद्ध आणि वैदिकपरपरा याच्यामधील भेद स्पष्ट स्थापित झाला नव्हता

१५ नुकताच बौद्धधर्म उत्पन्न झाला होता त्या वेळेस जितकी भूगोलाची माहिती होती, तितकीच वाग्भटामध्यें आहे

१६ गायीचे मास द्यावे असें वाग्भट म्हणतात ही गोष्ट ब्राह्मणधर्मास कधीही मान्य नाहीं आणि अशा प्रकारचा विचार पाचव्या साहाव्या शतकात फार प्रबळ झाला नुकताच बौद्धधर्म जेव्हा उत्पन्न झाला तेव्हा गोमास खाण्याचा प्रचार होता

१७ राजवैद्याचे नाव वाग्भटात आलें आहे म्हणून राजा आर्य होता आणि शूद्र नव्हता श्रमणा किंवा गोसावीण वाग्भटात आली आहे आणि बौद्धधर्म नुकताच प्रचारात आला होता तेव्हा गोसाविणी प्रसिद्धीस आल्या.

१८. चरकाचे नाव घेतलें आहे म्हणून वाग्भट पतजली नतर झाला

१९ नुकताच बौद्धधर्म जेव्हा प्रचारात आला होता, तेव्हा शास्त्रीय विभाग करण्याची जी पद्धति होती तशी पद्धति वाग्भटाच्या ग्रथात आढळते.

२० आमच्याजवळ सर्वांगसुदराटीकेसहित वाग्भटाच्या ग्रथाची जी प्रत आहे ती ४१० वर्षांची जुनी आहे

२१ वाग्भटामध्ये जी वनस्पतिविद्या आहे ती वैदिक किंवा प्रथम बौद्धाचार्यांच्या ग्रथापेक्षा अधिक आहे

२२ हेमाद्रीने सूत्रस्थान आणि कल्पस्थान यावर भाष्य केलें आहे म्हणून वाग्भटाचा काल प्राचीन असावा असें निष्पन्न होते

अशा प्रकारची प्रमाणे बरीच जमविता येतील तेणेंकरून वाग्भट ख्रिस्ती शकाच्या पूर्वी २०० वर्षे झाला असावा असें अनुमान काढावेसें आम्हास वाटते कारण त्यावेळी बौद्ध-राजानी जे जे हुकूम केले तेणेंकरून बौद्धपरपरेस बळकटी आली होती आणि बौद्धपरपरेप्रमाणे अहिंसा मुख्य धर्म, आणि या अहिंसेकडे लोकाचे मनही वळलें होते बहिरग प्रमाणाच्या योगाने जी आम्हास माहिती मिळाली ती आह्मीं पूर्वीच वाचकापुढे माडली आहे

भरतखडातील वैद्यकाचा शास्त्रीय इतिहास अशा प्रस्तावनेत देता येत नाहीं कारण वैद्यक, शस्त्रविद्या आणि त्याची प्रवृत्ति, याच्याशी सबध असणारे जे अनेक विषय आणि त्याविषयाच्या शाखा याची परीक्षा या विषयाच्या सबधाने करावी लागते वाग्भट कोण हें वाचकास सागावयाचे आहे त्याची योग्यता काय हे वाचकास कळवावयाचे आहे, आणि युरोपी लोकामध्ये शास्त्रज्ञान आणि उन्नति विशेष झाल्यामुळें त्याच्याशी वाग्भटास टक्कर मारावयाची आहे म्हणून या एकोणिसाव्या शतकात त्याचे योग्य गुण लोकास समजावे आणि वैद्यलोकामध्ये योग्य स्थान वाग्भटास मिळावे म्हणून हें सक्षिप्त विवेचन वाचकास सादर कले आहे

माहे आषाढ,<br>शके १८०२ }

**अण्णा मोरेश्वर कुंटे.**<br>बी ए एम् डी



# द्वितीयावृत्तिप्रस्तावना.

सुप्रसिद्धमिद यदनुमित्या दशशरद पूर्वमय ग्रन्थोऽस्माभिर्मुद्रित आसीदिति । समाप्तानि च तदानीन्तनाङ्कितान्यखिलानि पुस्तकानि । अतोऽस्य ग्रन्थस्य जिघृक्षूणा सम्प्रत्युद्भूत दौर्लभ्यमालोच्य मन्मित्रैर्निर्णयसागराख्यमुद्रणालयाधिपतिभि श्रीमद्भि जावजी दादाजीति प्रसिद्धैरस्य ग्रन्थस्य पुनर्मुद्रणविषयेऽह याचित । तदानी तथेत्यूरीकृत्य सूचित च तेभ्यो मया यदस्मिन् ग्रन्थे प्रथमाङ्कनसमयेऽवशिष्टदोषदूरीकरणेन पुन शोधनमपि करवाणि । कि त्वस्य सङ्ग्राहकाणा स्वल्पमूल्येन लब्धिर्भूयादिति । तैरपि तथेति सादर मत्सूचनामङ्गीकृत्येय द्वितीयावृत्तिर्लोकोपयोगार्थमङ्किताऽस्ति ।

कि नामायुर्वेद ? येन स्वस्थाना स्वास्थ्यरक्षणमातुराणा च रोगान्मुक्ततेति प्रकारद्वय यया विद्यया भवति सैवायुर्वेद । अस्माकमस्मिन्देशे पूर्व महानुभावा विद्वासोऽभवन् येषा चार्यावर्तबहिर्गतैर्लोकै साक सम्प्रति यथाऽस्माकमितरराष्ट्रै सम्बन्धो विद्यते तथा नाभवत् । तदानीमायुर्वेदेति सज्ञा कस्यचिदपि ऋषिप्रणीतग्रन्थस्याभवदित्यस्माक न भाति । स्वस्थातुरपरायणाख्यो यो वेद सोऽप्यन्यवेदवदपौरुषेय एवेति तेषा सिद्धान्त आसीत् । सम्प्रति च ये य उपलब्धा सुश्रुतचरकादयश्चिकित्साग्रन्थास्तेषा यद्यप्यपभ्रशेन लोकेष्वायुर्वेदसज्ञया व्यवहारो भवति, तथाऽपि ते सुश्रुतादयो ग्रन्था कथमभवन्निति तत्प्रादुर्भावमूलकारणे तत्त्वदृष्ट्या विचारिते सति इत्थ निर्णय स्वान्त आपतेदेव । धन्वन्तरेर्ये छात्रा यैश्च ग्रन्था रचितास्तेषु सुश्रुतप्रणीतो ग्रन्थ समीचीन । तथा भारद्वाजस्य येऽन्तेवासिनो ग्रन्थप्रणेतारोऽभवस्तेषा ग्रन्थेषु चाग्निवेशविरचितश्चरकप्रतिसंस्कृताख्य प्रबन्ध उत्तम । तद्यथा (सुश्रुत सू अ ४।९)–"औपधेनवमौरभ्र सौश्रुत पौष्कलावतम् । शेषाणा शल्यतन्त्राणा मूलान्येतानि निर्दिशेत् ॥" तथैव (चरक सू अ १)–"अथ मैत्रीपर पुण्यमायुर्वेद पुनर्वसु । शिष्येभ्यो दत्तवान् षड्भ्य सर्वभूतानुकम्पया ॥ अग्निवेशश्च भेलश्च जातूकर्ण पराशर । हारीत क्षारपाणिश्च जगृहुस्तन्मुनेर्वच ॥ बुद्धेर्विशेषस्तत्रासीन्नोपदेशान्तर मुने । तन्त्रप्रणेता प्रथममग्निवेशो यतोऽभवत् ॥ अतो भेलादयश्चक्रु स्व स्व तन्त्र कृतानि च ।" एतत्प्रामाण्यात् "आयुर्वेदो नाम यदुपाङ्गमथर्ववेदस्य" इति सुप्रसिद्ध वचनमनेकेषु ग्रन्थेषूपलभ्यते, तस्माच्च साक्षादायुर्वेदो ऋग्वेदादिवदपौरुषेयोऽस्ति, स लोकेषु नैवोपलभ्यत इति निर्विवादम् । अपि चास्मिन्प्राचीनतन्त्रे ये क्वचित्क्वचिन्मतभेदा दृग्विषयीभवन्ति तेभ्यश्च केषाचिज्जनानामायुर्वेदस्यापि वैकल्यनिर्देशे स्थललाभो भवति, तस्यापि कारण स्पष्ट दृश्यते । य कोऽपि सर्वज्ञ सर्वशक्तिमान् यश्चेन्द्रियमनोबुद्ध्याद्यगोचरस्तस्य नि श्वासभूत आयुर्वेदे मतभेदाना सिद्धान्तभेदाना च स्थलमेव नास्ति ।

चिकित्सिते श्रीमद्वाग्भटैर्महत् ग्रन्थद्वय प्रणीतम्, तत्रैकोऽष्टाङ्गहृदयमपरोऽष्टाङ्गसङ्ग्रहश्च । तत्राष्टाङ्गहृदयग्रन्थ आचार्यैस्तत्र तत्र विवाद्यमानानि स्थलानि वर्जयित्वा महत्सु ऋषिप्रणीतग्रन्थेषु यद्विस्तरेणानेकविषयाणा वर्णन कृतमस्ति तत्सार निष्कास्य निर्मितोऽस्ति । उक्त च तैरेव–"तेभ्योऽतिविप्रकीर्णेभ्य प्राय सारतरोच्चय । क्रियतेऽष्टाङ्गहृदय नातिसङ्क्षेपविस्तरम् ॥" आयुर्वेदस्तु लोके यथावन्नोपयुज्यते । सप्रति तस्य प्रवृत्तेरपि ह्रासश्चलति । अपिच कतिचिद्दिनैरायुर्वेदस्य मर्मज्ञातारो लोका नष्टा भवेयुरित्यनुमीयते । एतस्य कारणान्यनेकानि सन्ति । तेषु मुख्यमस्माक दौर्भाग्यम् । अपिच तेनैव दुर्दैवेनास्माक पराधीनताऽऽपतिता । नहि केवलमिय पराधीनता राष्ट्रसत्ताका सामान्या विद्यते, किन्तु तया न सर्व सबाह्याभ्यन्तर व्याप्तमासीत् । अपिच तयैव प्रबलतरे मोहान्धकूपे पातितानामत एव परवशानामस्माक यत्स्वनिकटवर्ति स्वीय रोचनार्ह वस्तुजात तत्सर्वमपि नैव रोचते । परेषा तु सर्वमपि रोचत एवेति कृत्वाऽनेन हेतुना यन्मानुषजात्युन्नतिनिसर्गविहित मुख्यकारण देशाभिमानाख्य तत्तु लय जिगमिषति । न ज्ञायते इत पर स्वल्पैरहोभिर्यन्न प्राचीनवैभवस्य केवल नामावशेषता स्यात् । तथा भरतवर्षस्याभिधानान्तरमपि स्यात् । अस्तु ।

चिकित्साशास्त्रप्रक्रियाज्ञानायान्यशास्त्रव्युत्पत्तिरपेक्षिता । अन्य शास्त्रैश्चिकित्सकस्यैकवाक्यता त्वतितरामीप्सिता । सा न स्याच्चेत्तर्हि यदि केचन भिषज शास्त्रिकीभवनमन्तरा वैद्यकमुपर्युपर्यवलोकयन्ति, तदाऽस्य शास्त्रस्य कथमपि निर्णयो न स्यात् । अत एवैतत्प्रमेय ज्ञापयितुमेक सिद्धान्तो विवियते । स चेत्थम् । "वायु पित्त कफश्चेति त्रयो दोषा समासत । विकृताविकृता देह घ्नन्ति ते वर्तयन्ति च ॥" इत्थ यश्चिकित्साशास्त्रस्यादिसिद्धान्तो विद्यते तस्य प्रक्रियामनवगम्य केषाचिद्विपरीतोऽन्त करणपरिणामो जात । स चेत्थम् । वातो नाम लोके य स्पर्शानुमेयो भौतिको बाह्य सञ्चारी वात । पित्त नाम यकृदुद्भूत पीतवर्ण किमपि प्रवाहि द्रव्यम् । तथा कफो नाम श्लेष्मरूप फुस्फुसाद्यन्तर्गत किमपि श्लेष्माख्य द्रव्यम् । इमे एव त्रिधातव इति ते मन्वते । परन्तु ते भ्रान्ता एव । एतद्विषयविवेचनेनास्यैव विस्तरस्य प्रस्तावनाया निवेश कार्य इति नास्माक हेतु । तथाऽपि चरकसुश्रुतवाग्भटैर्यद्वातस्य स्वरूप वर्णित तदुल्लेखेन तस्य तथ्य स्वरूप सर्वेषा लक्ष्यमापतेदेव । (च सू अ १२)–"वायुस्तन्त्रयन्त्रधर प्राणोदानसमानव्यानापानात्मा, प्रवर्तकश्चेष्टानामुच्चावचानाम्, नियन्ता प्रणेता च मनस, सर्वेन्द्रियाणामुद्योतक, सर्वेन्द्रियार्थानामभिवोढा, सर्वशरीरधातुव्यूहकर, सन्धानकर शरीरस्य, प्रवर्तको वाच, प्रकृति स्पर्शशब्दयो, श्रोत्रस्पर्शनयोर्मूलम्, हर्षोत्साहयोर्योनि, समीरणोऽग्ने, दोषसशोषण, क्षेप्ता बहिर्मलानाम्, स्थूलाणुस्रोतसा भेत्ता, कर्ता गर्भाकृतीनाम्, आयुषोऽनुवृत्तिप्रत्ययभूतो भवत्यकुपित । कुपितस्तु खलु शरीरे शरीर नानाविधैर्विकारैरुपतपति बलवर्णसुखायुषामुपघाताय, मनो व्याहर्षयति, सर्वेन्द्रियाण्युपघ्नन्ति, विनिहन्ति गर्भान्विकृतिमापादयत्यतिकाल धारयति, भयशोकमोहदैन्यातिप्रलापान् जनयति, प्राणाश्चोपरुणद्धि ॥ प्रकृतिभूतस्य

खल्वस्य लोके चरत कर्माणीमानि भवन्ति।" इत्थमेतत्त्रिदोषविषये प्राचीनग्रन्थान्तर्गतानि वचनानि पुरत स्थापितानि चेत्तेभ्यो दोषाणा स्वरूप स्थान लक्षण कार्यमित्येतेषा सिद्धता दृग्विषयीभूयात्।

सम्प्रत्यपर एक सिद्धान्तो विद्यते। सचेत्थम्। यस्मिन्विषय आप्तवाक्ययुक्त्यनुभवानामेकवाक्यता भवति स विषय सामान्यत सिद्ध इत्युरीकर्तव्यम्। अनादिकालादारभ्य वाग्भटावधि योऽनियमित कालो गतस्तस्मिन् वातपित्तकफाना तत्प्रकृतिविकृतिविषये च कदाऽपि विवादो नाजनि। तदनुरोधेन सवेषा स्वास्थ्यरक्षणं चाभूत्। येषा प्रकृतिज्ञानेन विकृतिलक्षणज्ञानेन चाद्यावधि व्याधीना ह्रासोऽभवत् तेषामिदानीमेवातिदौबोध्यमासीदितीय महाश्चर्यवार्ता।

श्रीमद्वाग्भटैरष्टाङ्गहृदयाख्यो ग्रन्थोऽतिसुलभ प्रणीतोऽस्ति। तस्य सूत्रस्थाने स्वास्थ्यरक्षणव्याधिनिवारणयोर्मूलतत्त्वानि प्रतिपादितानि सन्ति। यदि चेत्केषाचिदित्थ भासते, द्रव्यज्ञानार्थ भूगर्भशास्त्रमुद्भिद्विद्या रसायनादिशास्त्राणि चेत्येतेषा ज्ञानमवश्यमपेक्षितम्। कुतस्तत्तज्ज्ञानमार्यवैद्यकग्रन्थेषु ? क्वापि नोपलभ्यते। तथैव शारीरादिशास्त्राणामङ्गप्रत्यङ्ग विनिश्चय शरीरेन्द्रियविज्ञान शरीरेन्द्रियविकृतिविज्ञानमिति च शास्त्राणि तथा तादृशान्यन्यान्यपि शास्त्राणि येषा चिकित्साशास्त्रेण सार्धं नित्य साक्षात्सम्बन्धो विद्यते तेषा विचार क्वापि न दृग्गोचरीभवति। अतस्तत्सम्बन्धेनेत्थ विचार कार्य। यत्र चिकित्साया प्राधान्य विद्यते तत्रान्येषा शास्त्राणा विवेचनाय नावकाश। तथैवेदानीतनाङ्ग्लचिकित्साशास्त्रेऽप्युद्भिदादिशास्त्राणा समावेशो विद्यते वा ? इत्थमेतादृक्कुतर्कैरार्यवैद्यकस्याङ्गवैकल्यनिष्कासनेन ये केचनात्मीय समाधान कुर्वन्ति तान्प्रत्यस्मिन्विषये सुश्रुतप्रतिपादितमेवोत्तरम्। (सु सू अ ४।६)–"अन्यशास्त्रोपपन्नाना चार्थानामिहोपनिपतितानामर्थवशात्तेषा तद्विदेभ्य एव व्याख्यानमनुश्रोतव्यम्। कस्मात् ? न ह्येकस्मिन् शास्त्रे शक्य सर्वशास्त्राणामवरोध कर्तुम्। एक शास्त्रमधीयानो न विद्याच्छास्त्रनिश्चयम्। तस्माद्बहुश्रुत शास्त्र विजानीयाच्चिकित्सक॥" तस्मादार्यवैद्यकविषये स्वान्ते पूज्यबुद्धिमाश्रित्य आचार्यैर्यथा चिकित्साशास्त्र प्रतिपादित तत्तथैव देशकालमनुसृत्य सम्यगुपयोजित चेत्तर्हि कल्याणमेव स्यादिति भाति। अतो यावद्बुद्ध्युदयमिम ग्रन्थ सशोध्य यथा शुद्धो जातस्तथा विद्वज्जनपुरत सप्रति निहितोऽस्ति। अनेन ग्रन्थेन सर्वे लाभभाज सुखिनश्च भूयासुरिति जगन्नियन्तारमीश्वरं प्रति प्रार्थयते।

शकाब्दा १८१३ } कुण्टे इत्युपाह्वः,
सनाब्दा. १८९१ } अनन्तशर्मा.

सुमारे दहा वर्षांपूर्वी या ग्रथाची प्रथमावृत्ति आम्ही छापिली होती, ती आवृत्ति आज बरेच दिवस सपून गेल्याकारणाने हा ग्रथ ग्राहकास दुर्मिळ झालेला पाहून आमचे मित्र निर्णयसागर छापखान्याचे मालक रा रा जावजी दादाजी यानी याची दुसरी आवृत्ति छापण्याची परवानगी मागितली, त्या वेळी आम्हीं त्यास ती देऊन असे सुचविलें कीं, पहिल्या आवृत्तीमध्ये राहिलेले दोष यथामति आम्हीं काढून टाकून पुर्फेही तपासून देऊ, परंतु सर्व लोकास घेता येण्याजोगी याची किमत स्वल्प ठेवावी ती सूचना त्यानी मोठ्या आनदाने मान्य करून ही दुसरी आवृत्ति लोकोपयोगार्थ छापिली आहे

आयुर्वेद म्हणजे काय ? जेणेकरून स्वस्थाचे स्वास्थ्यरक्षण होते व आतुराची व्याधीपासून मुक्तता होते, हे दोन प्रकार ज्या विद्येने होतात तो आयुर्वेद आमच्या देशात पुरातनकाळी जे महान् महान् विद्वान् होऊन गेले, ज्याचा आर्यावर्ताच्या बाहेरील लोकाशी जसा आता आमचा सबध इतर राष्ट्राशी पडला आहे तसा पडला नव्हता, त्या वेळेस आयुर्वेद ही सज्ञा कोणच्याही ऋषिप्रणीत ग्रथाला होती असें आम्हास वाटत नाहीं स्वस्थातुरपरायण हा वेद इतर वेदाप्रमाणे अपौरुषेय असा त्याचा सिद्धात होता सध्या जे उपलब्ध सुश्रुत, चरकादि आयुर्वेदग्रथ याना जरी अपभ्रशाने आयुर्वेद म्हणतात, तथापि हेच ग्रथ कसे निर्माण झाले हे पाहिलें असता असें लक्षात येईल की, धन्वतरीचे जे अनेक शिष्य, व ज्यानी प्रबध रचले त्यापैकीं सुश्रुताचा ग्रथ उत्तम आणि भारद्वाजाजवळ जे अनेक शिष्य शिकले त्यापैकीं अग्निवेशकृत व चरकप्रतिसस्कृत हा प्रबध चागला (सुश्रुत सू० अ० ४।९)–"औपधेनवमौरभ्र सौश्रुत पौष्कलावतम्। शेषाणा शल्यतन्त्राणा मूलान्येतानि निर्दिशेत्॥"

तसेच (चर सू अ १)–"अथ मैत्रीपर. पुण्यमायुर्वेद पुनर्वसु। शिष्येभ्यो दत्तवान् षड्भ्य सर्वभूतानुकम्पया॥ अग्निवेशश्च भेलश्च जातूकर्ण पराशर। हारीत क्षारपाणिश्च जगृहुस्तन्मुनेर्वच॥बुद्धेर्विशेषस्तत्रासीन्नोपदेशान्तर मुने। तन्त्रप्रणेता प्रथममग्निवेशो यतोऽभवत्॥ अतो भेलादयश्चक्रु स्व स्व तन्त्रं कृतानि च।" यावरून व "आयुर्वेदो नाम यदुपाङ्गमथर्ववेदस्य" असें वाक्य जें अनेक ग्रथात उपलब्ध आहे त्यावरून, साक्षात् आयुर्वेद जो ऋग्वेदादिकाप्रमाणे अपौरुषेय आहे, तो उपलब्ध नाही असें म्हणावे लागते व या प्राचीन तन्त्रामध्ये जे कोठे कोठे मतभेद दृष्टीस पडतात व त्यावरून आयुर्वेदास नाव ठेवण्यास जी जागा कित्येक गृहस्थास मिळते, त्याचे कारण स्पष्ट होते सर्वज्ञ शक्तिमान् असा जो कोणी एक, जो इद्रियमनोबुध्यादिकाना अगोचर त्याचा निश्वास जो आयुर्वेद त्यात मतभेद किंवा सिद्धातभेद याना जागाच रहात नाहीं

श्रीमद्वाग्भटानी वैद्यशास्त्रावर दोन मोठे ग्रथ केले आहेत, त्याचीं नावें अष्टागहृदय व अष्टागसग्रह अशीं आहेत अष्टागहृदय हा ग्रथ-आचार्यांनी वादविवादाची स्थळे वर्ज्य करून

मोठमोठ्या ऋषिप्रणीत ग्रथात जे विस्ताराने अनेकविषयाचे विवेचन जाहलें आहे, त्याचा सार काढून निर्माण केला आहे ते म्हणतातच—"तेभ्योऽतिविप्रकीर्णेभ्य प्राय सारतरोच्चय । क्रियतेऽष्टाङ्गहृदय नातिसङ्क्षेपविस्तरम् ॥" आयुर्वेद जसा वापरला जावा तसा वापरला जात नाहीं त्याच्या प्रवृत्तीचा ऱ्हास होत चालला आहे व काहीं दिवसानी असेही होईल की, आयुर्वेदाचीं खरीं मर्मे जाणणारे मनुष्य नाहींतसे होतील याची कारणें अनेक आहेत त्यात प्रमुख आमचे दुर्दैव व त्याच दुर्दैवामुळे आमचा पराधीनपणा होय हा पराधीनपणा केवळ नुसता राज्यसत्तेचाच आहे असें नाही, तर या पराधीनतेने आमचे अतर्बाह्य सर्व व्यापून टाकलें आहे व असा प्रबल मोह उत्पन्न केला आहे कीं, आमचे स्वकीय जे आम्हाला सर्वप्रकारें आवडावे ते न आवडता दुसऱ्याचे तेच चागले वाटते व तेणेकरून देशाभिमान म्हणून जे मनुष्यजातीच्या उत्कर्षास मुख्य कारण ते नाहीसे होत चालले आहे कोण जाणे! यानतर जे सर्व आमचे प्राचीन वैभव होते, ते अगदी नाहींसें होऊन या भरतवर्षास नाव देखील अन्य मिळेल! असो

हिंदु वैद्यशास्त्राची प्रक्रिया समजण्यास अन्यशास्त्राचीं व्युत्पत्ति पाहिजे त्या इतर शास्त्राची एकवाक्यता या शास्त्राशी जाहली पाहिजे, तसें न झाल्यास जर वरवर कोणी वैद्यशास्त्र अवलोन करू लागेल, तर या शास्त्रापैकीं कोणत्याही प्रकारचा उलगडा होणार नाही, ही गोष्ट समजून देण्याकरिता एकच सिद्धात स्पष्ट करून पाहूया –"वायु पित्त कफश्चेति त्रयो दोषा समासत । विकृताविकृता देह घ्नन्ति ते वर्तयन्ति च ॥" हा जो वैद्यशास्त्राचा आदिसिद्धात आहे, त्याची खरी मोडणी ध्यानात न येऊन कित्येकाचे ग्रह विलक्षण झाले आहेत ते असे –वायु म्हणजे वारा, पित्त म्हणजे जें यकृतापासून होणारें पिवळे प्रवाही काहीं एक द्रव्य ते, आणि कफ म्हणजे श्लेष्मरूपी फुप्फुसादिकात असणारें एक दुसरें द्रव्य, हेच त्रिधातु असें ते लोक समजतात, परंतु ही त्याची मोठी चूक आहे या विषयाचे थोडक्यात विवेचन करून प्रस्तावनेत त्याचा सग्रह करण्याचा आमचा हेतु नाहीं, परतु चरक, सुश्रुत व वाग्भट यानीं जें वाताचे स्वरूप वर्णन केलें आहे, त्यावरून लक्षात येईल (च सू अ १२)– "वायुस्तन्त्रयन्त्रधर प्राणोदानसमानव्यानापानात्मा, प्रवर्तकश्चेष्टानामुच्चावचानाम्, नियन्ता प्रणेता च मनस, सर्वेन्द्रियाणामुद्योतक, सर्वेन्द्रियार्थानामभिवोढा, सर्वशरीरधातुव्यूहकर, सन्धानकर शरीरस्य, प्रवर्तको वाच, प्रकृति स्पर्शशब्दयो, श्रोत्रस्पर्शनयोर्मूलम्, हर्षोत्साहयोर्योनि, समीरणोऽग्ने, दोषसशोषण, क्षेप्ता बहिर्मलानाम्, स्थूलाणुस्रोतसा भेत्ता, कर्ता गर्भाकृतीनाम्, आयुषोऽनुवृत्तिप्रत्ययभूतो भवत्यकुपित । कुपितस्तु खलु शरीरे शरीरं नानाविधैर्विकारैरुपतपति बलवर्णसुखायुषामुपघाताय, मनो व्याहर्षयति, सर्वेन्द्रियाण्युपहन्ति, विनिहन्ति गर्भान्विकृतिमापादयत्यतिकाल धारयति, भयशोकमोहदैन्यातिप्रलापान् जनयति, प्राणाश्चोपरुणद्धि ॥ प्रकृतिभूतस्य खल्वस्य लोके चरत कर्माणीमानि भवन्ति ।" याप्रमाणे तिहींविषयी अनेक प्राचीन ग्रथातून वेचे देता येतील व त्यावरून या तिहीचे स्वरूपज्ञान, स्थान, लक्षण, कार्य, याची सिद्धता करून दाखविता येईल

आता असा एक दुसरा सिद्धात आहे की, ज्या गोष्टीविषयी आप्तवाक्य, युक्ति व अनुभव याची एकवाक्यता होते, ती गोष्ट साधारण सिद्ध असें समजले पाहिजे अनादिवेदापासून तो वाग्भटापर्यंत जो अनियमित काल गेला, त्या कालात ज्या वातपित्तकफाविषयी, त्याच्या प्रकृतीविषयी, त्याच्या विकृतीविषयी, कधीच तटा झाला नाही, ज्याच्या अनुरोधाने स्वास्थ्य रक्षण होत असे, ज्याच्या प्रकृतिज्ञानाने व विकृतिलक्षणावरून व्याधींचे निवारण होत आले आहे, ते आजच समजण्यास कसे कठीण झाले ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे

वाग्भटानी अष्टागहृदय हा मोठा सुलभ ग्रथ केला आहे याच्या सूत्रस्थानात स्वास्थ्यरक्षण व व्याधिनिवारण याची मूलतत्वे प्रतिपादन केली आहेत कित्येक लोकास असें वाटते की, द्रव्यज्ञान होण्याकरिता भूगर्भशास्त्र, उद्भिद्विद्या, रसायनादि शास्त्रे याची माहिती असली पाहिजे ती आर्यवैद्यक ग्रथात कोठे सापडत नाही तसेंच शारीरादि शास्त्राचे अगप्रत्यगविभाग, शारीरेंद्रियविज्ञान, शारीरेंद्रियविकृतिज्ञान, हीं व अशा तऱ्हेचीं दुसरीं शास्त्रे, ज्याचा साक्षात् चिकित्सेशीं सबध आहे, त्याचा विचार आढळत नाही तर त्यासबंधाने इतकाच विचार करावा की, ज्या ठिकाणी चिकित्सा ही प्रमुख आहे, त्यात दुसऱ्या शास्त्राचे विवेचन करण्यास सवड नसते अलीकडील इंग्रजी चिकित्साशास्त्राचे पुस्तक पाहिले असता उद्भिदादि शास्त्राचा समावेश केलेला असतो काय? अशा तऱ्हेचे कुतर्क काढून जे कित्येक आर्यवैद्यकाचें न्यून दाखवून आपलें समाधान करून घेतात त्याना यासबधाने जें सुश्रुतानी लिहिलें आहे तेच उत्तर —(सु सू अ ४।६) "अन्यशास्त्रोपपन्नाना चार्थाना इहोपनिपतिताना अर्थवशात् तेषा तद्विद्येभ्य एव व्याख्यानमनुश्रोतव्यम्। कस्मात्? न हि एकस्मिन् शास्त्रे शक्य सर्वशास्त्राणामवरोध कर्तुम्। एक शास्त्रमधीयानो न विद्याच्छास्त्रनिश्चयम्। तस्माद्बहुश्रुत शास्त्र विजानीयाच्चिकित्सक ॥" तेव्हां आर्यवैद्यकाविषयीं पूज्यबुद्धि मनात ठेऊन आचार्यांनीं ज्या रीतीने चिकित्साशास्त्राचे प्रतिपादन केलें आहे, ते यथार्थ देशकालाला अनुसरून जर उपयोगात आणलें, तर कल्याण होईल असें आम्हास वाटते म्हणून मेहनत करून आमच्या बुद्धीने हा ग्रथ जितका शुद्ध झाला तितका शुद्ध करून विद्वज्जनापुढे आम्हीं ठेविला आहे व त्यापासून सर्वास लाभ व्हावा हीच आमची ईश्वराजवळ प्रार्थना आहे

शके १८१३,
सन् १८९१

अणणा मोरेश्वर कुंटे,
बी. ए एम् डी.

